**मोटार वाहन विभागातील परिवहन कार्यालयांतील ई-गर्व्हनन्स प्रणालीच्या कार्यालयीन कामकाजासाठी आणि संगणकीकरणासाठी संगणक संच व प्रिंटर GeM पोर्टलवरून खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमव्हीडी-१२२०/प्र.क्र.२६२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ०२ मार्च २०२२

वाचा :-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. गृहआ-२०१५/प्र.क्र.२३०/आस्थापना-२, दि.२०.०५.२०१५.
२) उद्योग अर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस - २०१४ /प्र.क्र.८२/ भाग-III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६.
३) उद्योग अर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण -२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि.२४.०८.२०१७.
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआाका/का११/संगणक/योजनांतर्गत / हार्डवेअर खरेदी/ २१-२२/२०२२ जा.क्र.१३८३, दि.०२.०२.२०२२.
५) प्रकल्प अंमलबजावणी समितीची दि.२१.०२.२०२२ रोजी झालेली बैठक.

प्रस्तावना :-

मोटार वाहन विभागातील परिवहन आयुक्त कार्यालय व ५० परिवहन कार्यालयात ई-गर्व्हनन्स प्रणाालीच्या कार्यालयीन कामकाजासाठी आणि संगणकीकरणासाठी अ) Intel i५/AMD Processor युक्त बनावटीचे एकुण २० संगणक संच (All in One), ब) Intel i५/AMD Processor युक्त बनावटीचे २० लॅपटॉप, क) Intel i५/AMD Processor युक्त बनावटीचे १६० डेक्सटॉप, ड) ३० Laser MFM Printer + Scanner इ) ३०० Laser Printer इत्यादींची GeM Portal द्वारे खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

मोटार वाहन विभागातील परिवहन आयुक्त कार्यालय व ५० परिवहन कार्यालयांतील ई-गर्व्हनन्स प्रणाालीच्या कार्यालयीन कामकाजासाठी आणि संगणकीकरणासाठी खालील तपशिलात नमूद केल्याप्रमाणे संगणक संच व प्रिंटर खरेदीसाठी येणाऱ्या रु. २,१३,५०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी तेरा लाख पन्नास हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| तपशिल | दर (प्रति नग) | एकूण नग | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| All in One (intel i5 Processor) | १,२०,००० | २० | २४,००,००० |
| Laptop (intel i5 Processor) | ७५,००० | २० | १५,००,००० |
| Desktop (intel i5Processor) | ६५,००० | १६० | १,०४,००,००० |
| Laser MFM Printer + Scanner | २५,५०० | ३० | ७,५०,००० |
| laser Printer | २१००० | ३०० | ६३,००,००० |
| | | **एकूण** | **२,१३,५०,०००** |

२. सदरची खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या खरेदीबाबतच्या अटी व शर्तीनुसार व GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी करण्यात यावी.

३. यासाठी होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-३, लेखाशीर्ष २०४१, वाहनांवरील कर (०१) (०४) कार्यालयीन अभिलेखांचे संगणकीकरण ( मोटार वाहन आणि मोटार अपघात दावा न्यायाधिकरण) (२०४१०२९७), १३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या मंजूर निधीमधून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय वित्ती अधिकार नियम पुस्तिका, १९७८, मधील भाग-पहिला, उप विभाग-दोन मधील अनुक्रमांक २७-अ, नियम ७६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०२१६२७०७८८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2022.03.03 11:56:44 +05'30'

**(भरत रा. लांघी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

६. परिवहन उप आयुक्त (संगणक/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
९. अवर सचिव (माहिती व तंत्रज्ञान) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (परिवहन-४).